**आषाढीवारी – २०२५**

आषाढी एकादशी निमित्त **जळगाव जिल्ह्यातील संत मुक्ताई** यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था पुरविण्याच्या कामांना अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-११७९२११/यो-११**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक: २० जून, २०२५

**संदर्भः-**

१. ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र.तीर्थवि-२०२४/प्र.क्र.७७/यो-११, दि.१४.०६.२०२४.
२. ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र.तीर्थवि-२०२५/ ई-११५९४१७/यो-११, दि.१७.०६.२०२५.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प.जळगाव यांचे पत्र जा.क्र.ग्रापापूवि/तांशा/आर आर/ १४५/२०२५, दि. १९.०६.२०२५.

**प्रस्तावना :-**

मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांच्या २०२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये पुढीलप्रमाणे घोषणा केली आहे; **"संत ज्ञानेश्वर माऊली व संत तुकोबाराय यांचे पालखी सोबतच संत सोपान देव, संत निवृत्तीनाथ व संत मुक्ताई यांचे निर्मलवारी करिता २०.०० कोटी रूपये निधी देण्यात येईल".**

२. जिल्हा परिषद, जळगाव यांना संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये आषाढी वारी -२०२५ करिता जळगाव जिल्ह्यातील संत मुक्ताई यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना फिरते स्वच्छतागृहाची व इतर आवश्यक सुविधा पुरविण्यासाठी रू. १८२.९४ लक्ष निधी मंजूर करण्यात आला आहे. आता संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये जिल्हा परिषद, जळगाव यांनी संत मुक्ताई पालखी सोबत असणाऱ्या भाविकांना फिरते शौचालयाची सुविधा पुरविण्यासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्याअनुषंगाने जिल्हा परिषद, जळगाव यांना त्यांच्या मागणीप्रमाणे आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आषाढी वारी-२०२५ निमित्त जळगाव जिल्ह्यातील संत मुक्ताई यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी फिरते स्वच्छतागृहाची सुविधा पुरविण्यासाठी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेअंतर्गत, जिल्हा परिषद, जळगाव यांनी **रु. २०,००,०००/- (रु. वीस लक्ष फक्त)** इतक्या निधीची मागणी केली आहे. सदर मागणीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. “पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास” या योजनेंतर्गत सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२५१५ २५२१) या लेखाशीर्षाखाली रु.१००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

सद्यस्थितीत २५१५ २५२१ लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून जिल्हा परिषद, जळगाव यांना मंजूर करावयाच्या तरतुदीपैकी **रु. २०,००,०००/-** या रकमेच्या ७५% प्रमाणात **रू. १५,००,०००/- (रुपये पंधरा लक्ष फक्त)** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर निधी वितरीत करताना, ज्या कामांसाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे त्याच कामांवर खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांची राहील. सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास सादर करावीत. वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व निर्मलवारीत (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा) या बाबीवर झालेल्या एकूण खर्चाचा सविस्तर तपशील शासनास सादर करावा.

५. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००) (०७) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षात खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३२२/२०२५/व्यय-१५ दि. २९.०४.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५ अन्वये अटींची व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६२०१५१०५६९९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701FC3DB9C38A46F4CD82E1E450B51A9E92EEDE8C323934F82EDB538D3B20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.06.20 15:24:37 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
९. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक,
१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव,
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव,
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव,
१४. अवर सचिव, नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
१५. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६,अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२,
१६. कक्ष अधिकारी, कार्या- वित्त-१, ग्राम विकास विभाग
१७. निवड नस्ती यो-११.